GR-200407191259454001-2500

P.P.M.U.
प्रकल्प नियोजन व नियंत्रण
कक्षाची स्थापना

महाराष्ट्र शासन
महिला व बाल विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक पीएमयू-२००३/प्र.क्र.३०/का-१०.
नवीन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- १७ मार्च, २००३.

**प्रस्तावना :-** युनिसेफ व केंद्र शासन यांचेमध्ये १९९८ मध्ये झालेल्या करारानुसार युनिसेफच्या कार्यक्रमाचे समन्वय करण्याकरीता महिला व बाल विकास विभागास **समन्वय विभाग** म्हणून नेमण्यात आले आहे. या कार्यक्रमाचे संनियंत्रण करण्यासाठी मा.मुख्यसचिवांच्या अध्यक्षतेखाली **राज्यस्तरीय सल्लागार समिती** नेमण्यात आली आहे. युनिसेफने, महाराष्ट्राच्या बाल विकास धोरणावर आधारित दहाव्या पंचवार्षिक योजनेस समांतर कार्यक्रम तयार केला असून २००३-०७ च्या राज्य कृती आराखडयास राज्यस्तरीय सल्लागार समितीने व केंद्र शासनाने मान्यता दिली आहे. युनिसेफचे कार्यक्रम विविध विभागाबरोबर समन्वयाने राबविले जातात. बालविकास धोरण राबविण्यासाठी व युनिसेफचे कार्यक्रम कार्यान्वित करण्यासाठी केंद्र शासन, राज्य शासनाचे विविध विभाग, युनिसेफ आणि स्वयंसेवी संस्था यांचेबरोबर समन्वय साधणे, क्षेत्रिय भेटी देणे, अहवाल तयार करणे, कार्यशाळा व चर्चासत्रामध्ये भाग घेणे आणि त्याचा वृत्तांत विभागास देणे. तसेच वार्षिक कृती आराखडा तयार करणे, आढावा घेणे, राज्य सल्लागार समितीसाठी अहवाल तयार करणे, इ. अनेक बाबीसाठी एक स्वतंत्र कक्षाची आवश्यकता होती. युनिसेफच्या कार्यक्रमांमधून राज्यातील चालू योजना व कार्यक्रमाची गुणवत्ता व परिणामकारकता वाढविण्यास मदत होणार आहे. वरीलप्रमाणे, समन्वयाची गरज लक्षात घेऊन युनिसेफ आणि महिला व बाल विकास विभाग यांनी स्वतंत्र नियोजन व नियंत्रण कक्ष निर्माण करण्याचे प्रस्तावित केले होते.

**शासन निर्णय :-** महाराष्ट्र राज्य आणि युनिसेफ यांच्या संयुक्त विद्यमाने महिला व बाल विकास विभागात दिनांक १.३.२००३ ते ३०.१२.२००७ या कालावधीसाठी **प्रकल्प नियोजन व नियंत्रण कक्ष** (Project Planning & Monitoring Unit-**PPMU**) स्थापन करण्यात येत आहे. या कक्षाची रचना खालीलप्रमाणे राहील.

| पद | पदांची संख्या |
|---|---|
| १. राज्य संनियंत्रक State Co-ordinator | १ |
| २. संनियंत्रक (बाल सुरक्षा) Co-ordinator (Child Protection) | १ |
| ३. संनियंत्रक (बाल विकास) Co-ordinator (Child Development) | १ |
| ४. संशोधन सहाय्यक Research Assistant | १ |

२. वरील कक्ष महिला व बाल विकास विभागाचा एक भाग म्हणून सचिव, महिला व बाल विकास विभाग यांच्या नियंत्रणाखाली कार्यरत राहील. परंतू, या कक्षाचा संपूर्ण खर्च युनिसेफ करेल. त्यामुळे राज्य शासनावर कोणताही आर्थिक भार येणार नाही. राज्य संनियंत्रक, या कक्षाचे पर्यवेक्षकीय अधिकारी म्हणून काम पाहतील.

३. **राज्य संनियंत्रक** या पदावर महिला व बाल विकास विभागातील सध्या कार्यरत असलेल्या **नोडल अधिका-यास** प्रतिनियुक्त करण्यात येईल. हा अधिकारी अवर सचिव / उपसचिव दर्जाचा असेल व त्यास त्याच्या मूळ पदाचे सर्व अधिकार प्राप्त होतील. तसेच राज्य संनियंत्रक या पदावरील अधिकाऱ्याकडे सचिव, महिला व बाल विकास यांचे आदेशाने इतर कामकाजही सुपूर्द करता येईल. त्याच्या वेतनाचा व इतर खर्च युनिसेफ करेल.

४. इतर ३ पदे मानधनी पध्दतीने भरण्यात येतील. त्याची अर्हता, अनुभव, मानधन आणि कर्तव्ये व जबाबदाऱ्या युनिसेफच्या सल्ल्याने निश्चित करण्यात येतील.

५. या कक्षाचे कामकाज, या कक्षासाठी तयार करण्यात आलेल्या Terms of Reference (TOR) प्रमाणे करण्यात यावे. हे आदेश, मा.मुख्यसचिवांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

08.08.2012

( वासुदेव गोरडे )
सचिव

प्रति,
प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग (सेवा), मंत्रालय, मुंबई.

A:\PPMU.doc

प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, (कुटूंब कल्याण), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव.(कामगार), उद्योग उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
राज्य प्रतिनिधी, युनिसेफ, मुंबई (पत्राद्वारे).
व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, मुंबई.
सदस्य-सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग, मुंबई.
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे.
आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई.
मुख्य सचिवांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.मंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव.
मा.राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव.
निवडनस्ती, का-१०.